**प्रशासकीय मान्यता-**
अक्कलकुवा, जि.नंदूरबार येथे न्यायालयीन इमारतीच्या बांधकामाबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
शासन निर्णय क्र.सीसीबी १८९९/१३७२/(१०४)-का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. १३ जून, २००७.

**पहा :-** १) अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू)/६००१/१९९२, दि.१३ जुलै, २००५.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांचे पत्र क्र.५०९७/२००५, दि.३१.१२.२००१.

**शासन निर्णय** :- अक्कलकुवा, जि.नंदुरबार येथे न्यायालयीन इमारत बांधावयाच्या **रु.१,११,३४,०००/- (रु.एक कोटी अकरा लक्ष चौतीस हजार फक्त)** इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मूळ इमारत बांधकामाचा खर्च | ६२,००,६४० |
| २ | कंपाऊंडभिंत बांधकामाचा खर्च | ८,७१,९५७ |
| ३ | अंतर्गत रस्ते खर्च | २,८३,४१३ |
| ४ | अधिक ४% आकस्मिक खर्च | २,९४,२४० |
| ५ | अधिक १०% पाणी पुरवठा व जलनि:सारण उपाययोजना खर्च | ७,३५,६०१ |
| ६ | अधिक ११% विद्युतीकरण खर्च | ८,०९,१६१ |
| ७ | अधिक १५% किंमतीत दरसूचीवर झालेला सन २००५-०६ ते २००६-०७ चा वाढीव खर्च | ११,०३,४०१ |
| ८ | अधिक १०% किंमतीत झालेली वाढ | ७,३५,६०१ |
| ९ | रेन वॉटर हार्वेस्टींग खर्च | १,००,००० |
| | **एकूण रुपये** | १,११,३४,०१४ |
| | | **म्हणजेच** १,११,३४,००० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**" प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे ".**

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

(कृ.मा.प.)

E:\d olddata\DESK-13\Desk.13\Nandurbar/Nandurbar

४.  हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-१३९/इमा-२, दि. २१ मे, २००७, अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. क्रमांक:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
जिल्हा व सत्र न्यायाधीश,धुळे/नंदुरबार,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे,
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अक्कलकुवा,
जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार,
उप कोषागार अधिकारी, अक्कलकुवा,नंदुरबार,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.